**महाराष्ट्र दुकाने व आस्थापना अधिनियम १९४८, अंतर्गतच्या नियम १९६१ मधील नोंदणी व नुतनीकरणासंदर्भात अंमलबजावणी करणेबाबतची कार्यपद्धती.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग उर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय एमएसए-११/२०१४/ प्र.क्र.२७१/काम-१०,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- १८ मे, २०१५

<u>वाचा</u> १. शासन मसुदा अधिसूचना उद्योग, उर्जा व कामगार विभाग क्रमांक- एमएसए ११/२०१४/प्र.क्र.२७१/ काम-१०,दि.१४.११.२०१४.
२. शासन अधिसूचना उद्योग, उर्जा व कामगार विभाग क्रमांक-एएसए-११/२०१४/प्र.क्र.२७१/काम-१०, दि.१८.०५.२०१५

**<u>प्रस्तावना :-</u>**

महाराष्ट्र दुकाने व आस्थापना अधिनियम, १९४८ अंतर्गतच्या महाराष्ट्र दुकाने व आस्थापना नियम, १९६१ मधील नियम-६ मध्ये प्रस्तावित सुधारणेस अनुसरुन सदर सुधारणेमुळे परिणामित होणा-या सर्व संबंधितांच्या हरकती व सुचनांसाठी उक्त दि.१४/११/२०१४ रोजी सुधारण मसुदा अधिसुचना प्रसिध्द करण्यात आली होती. सदर मसुदा अधिसूचनेच्या अनुषंगाने विविध कामगार संघटना, मालक संघटना व व्यक्तीशः इत्यादी घटकांकडून हरकती व सूचना प्राप्त झाल्या होत्या. सदरहू प्राप्त झालेल्या हरकती व सुचना विचारात घेऊन महाराष्ट्र दुकाने व आस्थापना अधिनियम १९४८ व नियम १९६१ अंतर्गत नोंदणी दाखला व नुतनीकरण कार्यालयीन कामकाजाच्या सात दिवसांत जारी करण्याकरिता करावयाचा निर्णय घेतला आहे व त्याबाबतची अंतिम अधिसुचना महाराष्ट्र दुकाने व आस्थापना (पहिली सुधारणा) नियम, २०१५ दि.१८.०५.२०१५ रोजी प्रसिद्ध करण्यात आलेली आहे. त्यानुषंगाने महाराष्ट्र दुकाने व आस्थापना अधिनियम , १९४८ व महाराष्ट्र दुकाने व आस्थापना नियम १९६१ अंतर्गत नोंदणी दाखला व नुतनीकरण यासाठी अर्ज सादर करतांना हमीपत्र घेण्याबाबत तसेच प्राप्त झालेल्या अर्जावर नोंदणी दाखला व नुतनीकरण कार्यालयीन कामकाजाच्या सात दिवसांत जारी करण्याबाबत करावयाची कार्यपध्दती निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र दुकाने व आस्थापना अधिनियम, १९४८ व महाराष्ट्र दुकाने व आस्थापना नियम १९६१ अंतर्गत नोंदणी प्रमाणपत्र व नुतनीकरण प्रमाणपत्र यासाठी अर्ज सादर करतांना सदर शासन निर्णयासोबत जोडलेल्या “नमुना अब” मध्ये अर्जदाराकडून हमीपत्र घेण्यात यावे.

तसेच सदर सुधारणा अधिसूचनेप्रमाणे कार्यालयीन कामकाजाच्या सात दिवसांत कार्यवाही करावयाच्या दृष्टीने महाराष्ट्र दुकाने व आस्थापना अधिनियम, १९४८ व महाराष्ट्र दुकाने व आस्थापना नियम, १९६१ अंतर्गत विहित केलेल्या पध्दतीनुसार नोंदणी अथवा नुतनीकरणासाठी प्राप्त होणा-या परिपूर्ण अर्जांवर वेळेत कार्यवाही

होण्यासाठी प्रत्येक कार्यालय प्रमुख त्यांच्याकडे उपलब्ध असलेले दुकाने निरीक्षकांची संख्या विचारात घेऊन कार्यालयात दर दिवशी किमान १ दुकाने निरीक्षक उपस्थित राहिल अशी तजवीज करावी. अर्जदाराद्वारे/अर्ज सादरकर्त्याद्वारे अर्ज प्राप्त झाल्यानंतर अर्जदारास/अर्ज सादरकर्त्यास पावती देण्यात यावी. अर्जामध्ये त्रुटी असल्यास अथवा विहित शुल्क भरले नसल्यास, तसेच त्यासोबत आवश्यक कागदपत्रे जोडली नसल्यास त्याबाबतच्या योग्य कारणांसह अर्जदारास/अर्ज सादर करणा-या प्रतिनिधी सोबत अर्ज परत करावा.

तद्नंतर आवश्यक कागदपत्रे जोडलेल्या व विहीत शुल्क भरलेल्या पात्र अर्जांबाबत पुढील कार्यालयीन कामकाजाच्या दिवशी जे दुकाने निरीक्षक उपस्थित असतील त्यांच्याद्वारे सदरहू अर्जांबाबत विहित कालावधीत निर्णय घेण्यात यावा. दर दिवशी प्राप्त होणारे नोंदणी अथवा नुतनीकरणासाठीचे अर्ज विहीत कालावधीत निकाली काढण्याच्या दृष्टीने कार्यवाही करावी. कामगार आयुक्त यांनी सदरहू बाबीनुषंगाने सर्व क्षेत्रिय कार्यालयांना व सक्षम प्राधिका-यांना उचित सुचना द्याव्यात.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashstra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०५१९११४२४२८२१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Balasaheb Sopan Kolase

Digitally signed by Balasaheb Sopan Kolase
DN: c=IN, o=All India Service, ou=IAS, postalCode=110001, st=Maharashtra, cn=Balasaheb Sopan Kolase
Date: 2015.05.19 11:46:40 +05'30'

**(बाळासाहेब कोळसे)**
शासनाचे सहसचिव

**प्रत-**

१. मा. मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव.
२. मा. राज्यमंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव.
३. प्रधान सचिव (कामगार) यांचे स्विय सहायक.
४. कामगार आयुक्त, मुंबई
५. आयुक्त, बृहन्मुंबई महानगर पालिका, मुंबई
६. मुख्य दुकाने निरिक्षक, बृहन्मुंबई महानगर पालिका, मुंबई.
७. कामगार आयुक्त, मुंबई यांच्यादारे सर्व क्षेत्रिय कार्यालयांना अग्रेषित.
८. निवडनस्ती.

(शासन निर्णय- उद्योग, ऊर्जा कामगार विभाग क्रमांक- एमएसए-११/२०१४/प्र.क्र.२७१/कामगार-१०, दि.१८/०५/२०१५ सोबतचे हमीपत्र.)

# नमुना-अब

# हमीपत्र

मी/ आम्ही प्रतिज्ञापूर्वक कथन आणि घोषित करतो की, मी/ आम्ही मे....................या आस्थापनेचे मालक/ भागीदार/ संचालक/ विश्वस्थ / कर्ता / कब्जेदार / प्रवर्तक आहोत व............(व्यवसायाच्या ठिकाणचा पत्ता).......या ठिकाणी व दि..................रोजीपासून नविन व्यवसाय सुरु करु इच्छितो.

मी/आम्ही माझ्या/आमच्या ओळखीचा पुरावा म्हणून मतदार नोंदणी पत्र/पॅन कार्ड/ वाहन चालकाचा परवाना/ आधार कार्ड सादर केले आहे.

मी/आम्ही व्यवसायाच्या ठिकाणच्या सत्यतेच्या समर्थनार्थ खरेदी खत/भाडेपट्टी/ जागेचे भाडे /दुरध्वनी देयक/ वीज देयक सादर केले आहे. ( मंडळ/विश्वस्थ/महामंडळ/संस्था/स्वायत्त संस्था यांकरिता आवश्यक असल्यास मंडळाचा ठराव)

मी/आम्ही सादर करतो की, व्यवसाय चालवितांना जास्तीतजास्त..........इतके कामगार कामावर ठेवू/ठेवले आहेत आणि शासनाने निर्धारित केल्यानुसार शुल्क अदा करु.

मी/आम्ही सादर करतो की, भारतात अस्तित्वात असलेल्या कायद्यांनुसार बेकायदेशीर असलेली कोणतीही अनुचित क्रियाकलाप वा व्यवसाय करणार नाही असे आश्वासित करतो.

मी/आम्ही घोषित करतो की, कोणत्याही सक्षम प्राधिका-याने कोणत्याही कायद्यानुसार वा आदेशानुसार मनाई केलल्या परिसरात/जागेवर आम्ही व्यवसाय सुरु करित असलेली जागा/ चालू असलेली जागा अस्तित्वात नाही.

मी/आम्ही सादर करतो की, आस्थापनेची नोंदणीकृत पत्ता पुढीलप्रमाणे आहे.......................................................................................................................

.......................................................................................................................

मला/आम्हाला याची पूर्ण जाणीव आहे की, महाराष्ट्र दुकाने व आस्थापना अधिनियम, १९४८ अंतर्गत आमची आस्थापना नोंदणीकृत असली तरी उक्त मालमत्तेचा मालकी हक्क / ताबा /इतर हक्क अबाधित राहतील. उक्त कागदपत्र जागेच्या कोणत्याही हक्काविषयी दावा करण्यासाठी वापरले जाणार नाही.

मी/आम्ही महाराष्ट्र दुकाने व आस्थापना अधिनियम, १९४८ आणि त्याअंतर्गत नियम यांमधील तरतुदी आणि त्याअंतर्गत कोणत्याही प्राधिका-याने दिलेल्या आदेशास बांधील आहोत.

मी/आम्ही याद्वारे जाहीर करतो की, सदर अर्जामध्ये दिलेली सविस्तर माहिती आणि विवरण मला ज्ञात असल्यानुसार व माझ्या विश्वासानुसार सत्य असून आपल्यापासून कोणतीही माहिती दडवून/लपवून ठेवलेली नाही.

मला/आम्हाला याची पूर्ण जाणीव आहे की, अर्जामध्ये दिलेली माहिती जर असत्य अथवा चुकीची अथवा दिशाभूल करणारी असेल वा विपर्यास करुन मिळविलेले असल्यास सदर नोंदणी प्रमाणपत्र रद्द होईल आणि मी/आम्ही कोणत्याही कायदेशीर कारवाईस अथवा कायद्यामध्ये नमुद इतर कारवाईस वा इतर परिणामांस वा त्यानुसार जी कारवाई समर्थनीय असेल त्यास पात्र राहू.

दिनांक-

स्थळ- अर्जदाराची स्वाक्षरी.

सोबत जोडलेल्या कागदपत्रांचा तपशील-

अ) छायाचित्राचा पुरावा (मतदार नोंदणी पत्र/पॅन कार्ड/ वाहन चालकाचा परवाना/पास पोर्ट/ आधार कार्ड इ.)

ब) आधार कार्ड

क) व्यवसायाच्या जागेसंबंधी पुरावा.

ड) आवश्यक असल्यास व्यवसाय सुरु करवायाचा पुरावा,

इ) शुल्क सादर केले असल्याचा पुरावा.